राज्यातील वनांचे व्यवस्थापन शाश्वतरित्या होण्याकरीता कार्य आयोजना विभागातील पदांवर भारतीय वनाधिकाऱ्यांची (भा.व.से.) पदस्थापना करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक: आयएफएस-२०२३/प्र.क्र.३३/फ-७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २५ एप्रिल, २०२३

**वाचा** : १) राष्ट्रीय कार्य आयोजना संहिता-२०१४ मधील भाग-३
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे दि.१५/११/२०२२ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

वनांचे व्यवस्थापन शाश्वतरित्या होण्याकरीता राष्ट्रीय कार्य आयोजना संहिता-२०१४ (National Working Plan Code-2014 for the Sustainable Management of Forests and Biodiversity in India) च्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे कार्य आयोजना तयार करुन केंद्र शासनाची मान्यता घेतली जाते. सन १९९६ मध्ये मा.सर्वोच्च न्यायालयाने गोदावर्मन तिरुमलपाद विरुध्द केंद्र सरकार या प्रकरणात केलेल्या न्याय निवाड्यामध्ये देशातील वनांचे व्यवस्थापन मंजूर कार्य आयोजनेप्रमाणे केले जाईल, असे निर्देश जारी केलेले आहेत. कार्य आयोजनेचे महत्व लक्षात घेता, राष्ट्रीय कार्य आयोजना संहिता- २०१४ च्या परिच्छेद क्र.२९ मध्ये “A Working Plan Unit (WPU) at the field level should be headed by Working Plan Officer (WPO) of the rank of Conservator of Forests” असे नमुद आहे. या धर्तीवर काही राज्यांनी धोरण निश्चित केले आहे. पदस्थापनेबाबत या राज्याने ही तरतूद विचारात घेऊन वनसंरक्षक दर्जाचे अधिकाऱ्यांची कार्य आयोजना पदावर धोरण निश्चित केलेले आहे.

मागील काही वर्षापासून राज्यात कार्य आयोजना विभागामध्ये पदस्थापना करतांना ज्या अधिकाऱ्यांना क्षेत्रीय कामांचा पुरेसा अनुभव नाही किंवा कमी अनुभव असलेल्या अधिकाऱ्यांची पदस्थापना झाली असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे कार्य आयोजना लिहितांना होणारा विलंब आणि कार्य आयोजनेची गुणवत्ता यावर विपरीत परिणाम होत असल्याचे दिसून आले आहे.

वरील पार्श्वभूमी विचारात घेता, राज्यातील सर्व कार्य आयोजना विभागातील पदांवर भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांची पदस्थापना करणेबाबत धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१) कार्य आयोजना विभागात प्रामुख्याने वन संरक्षक दर्जाच्या अधिकाऱ्याची पदस्थापना करण्यात यावी.

२) वनसंरक्षक दर्जाचे अधिकारी उपलब्ध न झाल्यास उप वनसंरक्षक दर्जाचे किमान १० वर्षाची सेवा झालेले आणि किमान एक तरी प्रादेशिक वन विभागात पूर्ण कार्यकाळ (३ वर्षे) सेवा झालेल्या अधिकाऱ्याची पदस्थापना करण्यात यावी.

३) उप वनसंरक्षक व वनसंरक्षक दर्जाच्या अधिकाऱ्याची कार्य आयोजनेमध्ये पदस्थापना झाल्यानंतर त्यांची बदली किंवा पदोन्नती झाली तरी संबंधित अधिकारी ज्या विभागाची कार्य आयोजना हाताळत असतील त्या विभागाची कार्य आयोजना लिहिण्याची जबाबदारी त्याच अधिकाऱ्याची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५०४१२३०५८४२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करूनकाढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=b00b3ae6f82b447bdd60190209f1258e170f8f617d261f81e6281dfbfdf28c0d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B752370B557D0A3E58B4B069230BC54F6A13D04798D2EE7A3F1C7DCC5655271C, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2023.05.04 12:36:52 +05'30'

**(डॉ. रविरिकरण गोवेकर)**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई-४०० ०३५.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर-४४० ००१.
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), नागपूर.
९. वनसंरक्षक (कार्य आयोजना), नागपूर/पुणे.
१०. सर्व मुख्य वनसंरक्षक/वनसंरक्षक/उप वनसंरक्षक/विभागीय वन अधिकारी (भावसे संवर्ग)
११.निवड नस्ती (कार्यासन फ-७),महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.